“जत्रा शासकीय योजनांची सर्व सामान्यांच्या विकासाची” हे अभियान कृषि विभागार्फत राबविण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.४५/२-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२,

दिनांक :- १७ एप्रिल, २०२३

**संदर्भ**:- १.कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.४०/२-अे दि.०८.०४.२०२२

२. नियोजन विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.०५/१४१४ दि.१३.०४.२०२३

**प्रस्तावना:-**

कृषि विभागामार्फत बाह्य सहाय्यित प्रकल्प, विविध केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांची अंमलबजावणी करण्यात येते. केंद्र पुरस्कृत योजनांचे वार्षिक कृति आराखडे अंतिम झाल्यानंतर केंद्र शासनाकडून वर्षभरात टप्प्याटप्प्याने निधी प्राप्त होतो. त्याचप्रमाणे, राज्य पुरस्कृत योजनांसाठी देखील वित्त विभागाकडून टप्प्याटप्प्याने निधी प्राप्त होतो. कृषि विभागास निधी टप्प्याटप्प्याने प्राप्त होत असला तरी कृषि क्षेत्राचे कामकाज हे हंगामनिहाय चालते. तसेच, खरीप व रब्बी हंगामात लागवडीखाली येणाऱ्या क्षेत्रापैकी सुमारे ७५ % क्षेत्रावर खरीप हंगामातच विविध पिकांची लागवड होते. त्यामुळे खरीप हंगाम हा राज्याच्या अर्थव्यवस्थेच्या आणि शेतकऱ्यांच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचा आहे. सबब, खरीप हंगामातील पिकांना पूरक ठरणाऱ्या विविध योजनांतर्गत बाबींची खरीप हंगाम पूर्व व हंगाम कालावधीतच अंमलबजावणी करण्याकरीता संदर्भ क्र. १ अन्वये स्थायी आदेश निर्गमित केला आहे.

नियोजन विभागाने संदर्भ क्र. २ अन्वये शासकीय योजना लोकाभिमुख करुन त्यांची अंमलबजावणी गतिमान करण्यासाठी “**जत्रा शासकीय योजनांची सर्व सामान्यांच्या विकासाची**” हे अभियान राबविण्यासाठी सर्व प्रशासकीय विभागांना विभागामार्फत राबविल्या जाणाऱ्या केंद्र व राज्य शासनाच्या योजनांचा आढावा घेऊन या उपक्रमांतर्गत राबवावयाच्या योजनांचे जिल्हानिहाय उद्दिष्ट ठरवावे व ठरवून दिलेले उद्दिष्ट साध्य करण्यासाठी क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत स्वयंस्पष्ट सूचना निर्गमित करण्याबाबत सूचित केले आहे.

या पार्श्वभूमीवर, खरीप हंगामापूर्वी शेतकऱ्यांना आपल्या शेतीकरिता आवश्यक बाबींच्या खरेदीसाठी व शेतीकरीता पायाभूत सुविधांच्या उभारणीसाठी कृषि विभागाच्या विविध योजनांच्या माध्यमातून वेळीच अर्थसहाय्य करता यावे याकरिता **“जत्रा शासकीय योजनांची सर्व सामान्यांच्या विकासाची”** हे अभियान कृषि विभागार्फत राबविण्याकरीता पुढीलप्रमाणे शासन परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक:-**

कृषि विभागाच्या खालील योजनांसाठी **"जत्रा शासकीय योजनांची सर्व सामान्यांच्या विकासाची"** हे अभियान दिनांक १५ एप्रिल, २०२३ ते १५ जून, २०२३ या कालावधीत राबविण्यात यावे. सदर अभियान जिल्हास्तरावर राबविण्याची जबाबदारी जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांची राहिल. त्याकरिता दि. १५.०४.२०२३ ते १५.०५.२०२३ या कालावधीत या अभियानाची पूर्व तयारी करावी.

- **केंद्र पुरस्कृत योजना:-**
  - राष्ट्रीय कृषि विकास योजना - प्रति थेंब अधिक पिक
  - राष्ट्रीय कृषि विकास योजना - कृषि यांत्रिकीकरण
  - राष्ट्रीय कृषि विकास योजना - मृद आरोग्य व सुपिकता
  - राष्ट्रीय कृषि विकास योजना - परंपरागत कृषि विकास योजना
  - राष्ट्रीय कृषि विकास योजना - अवर्षन प्रवण क्षेत्र विकास
  - कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा व पोषण अभियान
  - कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय खाद्यतेल अभियान
  - कृषि उन्नती योजना - बियाणे व लागवड साहित्य उपअभियान
  - कृषि उन्नती योजना - एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान
  - कृषि उन्नती योजना - कृषि विस्तार
  - आत्मनिर्भर भारत अंतर्गत प्रधानमंत्री सूक्ष्म खाद्य कृषि उन्नयन योजना
- **राज्य पुरस्कृत योजना:-**
  - पिकावरील कीड रोग सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प
  - किमान आधारभूत किंमत व कृषि उत्पन्न बाजार समिती आधारीत दर यामधील फरकाची रक्कम बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबत
  - सेंद्रीय/विषमुक्त शेती योजनेंतर्गत डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन
  - राज्य पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण योजना
  - मुख्यमंत्री कृषि व अन्नप्रक्रीया योजना
  - जिल्हा कृषि महोत्सव योजना
  - मुख्यमंत्री शाश्वतकृषि सिंचन योजना
  - पीक स्पर्धा
  - कापूस, सोयाबीन व इतर तेलबिया पिकांची उत्पादकता वाढ व मूल्य साखळी विकासासाठी विशेष कृती योजना
  - गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना
  - भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना

- प्रधानमंत्री किसान सन्मान निधी या योजनेच्या लाभार्थ्यांच्या माहितीमध्ये दुरुस्ती करण्यासाठी आणि कृषि सेवा केंद्रांचे परवाने देण्यासाठी या अभियानांतर्गत विशेष मोहिम राबवावी.

२. उपरोक्त केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांसाठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तकामध्ये मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या किमान ८० टक्के निधी उपलब्ध होईल असे गृहित धरुन उपरोक्त योजनांकरीता लाभार्थी निवडीची प्रक्रिया महाडीबीटी प्रणालीद्वारे तातडीने सुरु करावी. याकरीता आवश्यक ती प्रसिध्दी देण्यात यावी.

३. या अभियानाकरीताचे जिल्हा व तालुका निहाय लक्ष्यांक जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी जिल्हाधिकारी यांच्या समन्वयाने आयुक्त, कृषि यांच्या मान्यतेने निश्चित करावेत.

४. कृषि आयुक्तालयाने ८० टक्के निधीच्या मर्यादेत जिल्हा व तालुका निहाय अस्थायी स्वरुपात आर्थिक व भौतिक लक्ष्यांक निश्चित करुन द्यावेत आणि केंद्र पुरस्कृत योजनांचे वार्षिक कृती आराखडे अंतिम झाल्यानंतर सुधारीत जिल्हा व तालुका निहाय आर्थिक व भौतिक लक्ष्यांक क्षेत्रीय स्तरावर कळवावेत.

५. मागील काही वर्षांत शेतकऱ्यांच्या अर्जांना पूर्वसंमती दिल्यानंतर योजना अंमलबजावणी पूर्ण करण्याच्या प्रक्रियेत शेतकऱ्यांच्या गळतीचे प्रमाण लक्षात घेता, प्रत्येक योजनेकरीता जिल्हा/तालुका निहाय प्राप्त होणाऱ्या एकूण आर्थिक लक्ष्यांकांच्या किती पट सोडत काढावी याचा निर्णय योजनेशी संबंधित कृषि संचालकांनी आयुक्त (कृषि) यांच्या मान्यतेने घ्यावा.

६. सदर अभियानामध्ये अर्ज केलेले अर्जदार, योजनेचे नाव, पात्र/अपात्र अर्जदार, अपात्रतेची कारणे इ. तपशील अद्ययावत ठेवावा.

७. सदर अभियानाच्या यशस्वी अंमलबजावणीकरीता आयुक्त (कृषि) यांनी त्यांच्या स्तरावरून स्वतंत्रपणे सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात.

८. कृषि आयुक्त यांनी दैनंदिन आढावा घ्यावा. तसेच त्याबाबतचा अहवाल शासनास नियमितपणे प्रत्येक आठवड्यात (सोमवार) सादर करावा.

९. याव्यतिरिक्त नियोजन विभागाने संदर्भ २ अन्वये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०४१७१६५४००६८०१ आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

EKNATH RAJARAM DAWALE

Digitally signed by EKNATH RAJARAM DAWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=499dd4df91587ffef1e20a2ee9e560dd0777e49ff6cfc838f362fdbb58c58e7b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=17E427867F9F7ACF49F42A7E5B92B77D56EC1F261F185C142A9F28D7626190FB, cn=EKNATH RAJARAM DAWALE
Date: 2023.04.17 20:01:10 +05'30'

**(एकनाथ डवले)**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,

२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

५. मा.उप सभापती , महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

६. मा.उप अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

७. सर्व सन्माननीय सदस्य, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,

९. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,

१०.मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) विभाग यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

११.सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव,

१२.मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,

१३.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधापरिषद), विधानभवन, मुंबई,

१४.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), विधानभवन, मुंबई,

१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ न्याय शाखा), मुंबई/औरंगाबाद/नागपूर,

१६.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई/औरंगाबाद/नागपूर,

१७.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/औरंगाबाद/नागपूर,

१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,

१९.महासंचालक, माहिती जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,

२०.सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी,

२१.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे.

२२.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

२३.सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

२४.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.

२५.सर्व सह सचिव / उप सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२६.कृषि संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे.

२७.विभागीय कृषि सह संचालक (सर्व).

२८. सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२८.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व).

२९. संग्रहार्थ निवडनस्ती (२अे).